**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**क्रमांकः प्रतिनि-२०१८/प्र.क्र.१५३/का.१४**
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक: १६ ऑक्टोबर, २०१८

## आदेश

श्री.रणजीत आ. पाटील, अवर सचिव, गृहनिर्माण विभाग यांची कृषी व पदुम विभागाच्या अधिपत्याखालील कुलसचिव, वसंतराव नाईक मराठवाडा कृषी विद्यापीठ, परभणी या पदावर प्रथमत: दोन वर्षासाठी खालील अटी व शर्तीच्या अधीन राहून प्रतिनियुक्तीने नियुक्ती करण्यात येत आहे.

अ) श्री.रणजीत आ. पाटील, अवर सचिव ज्या तारखेला प्रतिनियुक्तीच्या पदावर रूजू होतील त्या तारखेपासून प्रतिनियुक्तीच्या सेवेचा प्रारंभ होईल आणि ती सेवा ज्या तारखेला तो आपल्या शासकीय पदाचा कार्यभार पुन्हा स्विकारील त्या तारखेला समाप्त होईल.

ब) जर त्यांची सेवा लोकसेवेच्या हिताच्या दृष्टीने शासनाला आवश्यक वाटली तर प्रतिनियुक्तीचा कालावधी संपण्यापूर्वी कोणत्याही वेळी त्यांना परत बोलावून घेण्याचा अधिकार शासन/सक्षम प्राधिकाऱ्यास राहील.

क) जर त्यांची सेवा स्वीयेतर नियोक्त्याला आवश्यक वाटली नाही तर त्यांना मूळ विभागाकडे परत पाठविण्याची मुभा स्वीयेतर नियोक्त्याला राहील. मात्र याप्रमाणे परत पाठविण्यापूर्वी स्वीयेतर नियोक्त्याने शासनाला/सक्षम प्राधिकाऱ्याला तीन महिन्यांची नोटीस दिली पाहिजे; आणि

ड) त्यांनी मूळ विभागाकडे परत जाण्याचा आपला उद्देश आहे अशी कमीत कमी तीन महिन्यांची लेखी नोटीस शासनाला / सक्षम प्राधिकाऱ्याला दिल्यानंतर त्यांना मूळ विभागाकडे परत येण्याची मुभा राहील.

२. महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेतर सेवा... इ.) नियम १९८१ मधील नियम ४० (परिशिष्ट दोन ) मधील तरतुदी विचारात घेऊन गृहनिर्माण विभाग व कृषी व पदुम विभाग यांनी श्री.रणजीत पाटील यांच्या प्रतिनियुक्तीबाबतच्या अटी व शर्ती आपआपसात ठरवाव्यात.

३. श्री.रणजीत आ. पाटील, अवर सचिव यांच्या इतर सर्व प्रशासकीय बाबी गृहनिर्माण विभागामार्फत हाताळण्यात येतील.

४. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१०१६१७३३२३८१०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Gajanan
Bhimrao Gurav

Digitally signed by Gajanan Bhimrao Gurav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8a5b973b0795ae988a7c005050f9180a8021798a5c1ed41ada8a72725a47b4f0, serialNumber=54b11b1ccbdc577d71dce3b313c3fef5dc2ad659e360f73b682d6b6fccb8aecf, cn=Gajanan Bhimrao Gurav
Date: 2018.10.16 17:40:19 +05'30'

( ग.भि.गुरव )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

१) मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन
२) मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव

३) अ.मु.स (सेवा), सा.प्र.वि., मंत्रालय, मुंबई

४) अ.मु.स./प्रधान सचिव/सचिव, गृहनिर्माण विभाग / कृषी व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई

५) सह/उप सचिव (आस्थापना), गृहनिर्माण विभाग / कृषी व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई

६) सह/उप सचिव (कार्या.६-ए ), कृषी व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई

७) कुलसचिव, वसंतराव नाईक मराठवाडा कृषी विद्यापीठ, परभणी

८) श्री.रणजीत आ. पाटील, अवर सचिव, गृहनिर्माण विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३ (प्रशासकीय विभागामार्फत)

९) कार्या.१४ संगहार्थ.